महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा
व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत
करण्याबाबत.
खापा नगर परिषद, ता. सावनेर, जि. नागपूर

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१४/प्र.क्र.३३६/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १ ऑगस्ट, २०१७

**वाचा :**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.नापापु- २००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२. २००८
३. शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०११/प्रक्र.४७३/पापु-२२, दि.१४.९.२०११
४. कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा.,जल व उर्जा ले.प. विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.मजीप्रा/जऊलेपविना/तांशा-३/७८४, दि.१३.१०.२०११
५. शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१२/प्रक्र.५६४/पापु-२२, दि.१३.९.२०१२

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १४.९.२०११ अन्वये खापा शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. ६६,८९,०००/- किंमतीच्या सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जल व उर्जा लेखापरिक्षण विभाग, नागपूर यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये खापा शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांच्या एकूण रु. ६२,५१,१५२/- इतक्या निव्वळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. खापा नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी रु. ३,३३,६७१/- इतकी रक्कम संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असुन मंजूर "जलवाहिनी वितरण व्यवस्था टाकणे" या कामासाठी रु.३,५१,०००/- इतकी रक्कम धनादेशाद्वारे महाराष्ट्र जीवन

प्राधिकरणाकडे वर्ग केली आहे. शासन निर्णय, दि.१३.९.२०१२ अन्वये रुपये २९.९७ लक्ष अनुदान खापा नगरपरिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, खापा नगरपरिषद यांनी रुपये २३,२४,०००/- रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असुन कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार विभाग, नागपूर यांनी रु.११.०० लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार विभाग, नागपूर यांनी मंजूर सुधारणा कामे (उर्जा लेखापरीक्षण, बिलिंग व वसुली संगणकीकरण ही कामे वगळून) पुर्ण झाली असल्याबाबतचे "Completion Certificate" सादर केले असुन त्यामध्ये योजनेवरील खर्च (Expenditure on Scheme) रुपये ३१,९९,६६२/- झाला असल्याचे नमूद आहे. तसेच, उप विभागीय अभियंता, म.जी.प्रा.नागरी व ग्रामीण योजना उप विभाग क्र.२, नागपूर यांनी मंजूर "वितरण वाहिनी" चे काम पुर्ण झाले असल्याबाबतचे "Completion Certificate" सादर केले असुन त्यामध्ये योजनेवरील खर्च (Cost of Work Done) रुपये १६,६१,७०७/- झाला असल्याचे नमूद आहे. योजनेवर झालेल्या खर्चाप्रमाणे योजनेची किंमत (रु.३१,९९,६६२ + रु.१६,६१,७०७ = रु.४८,६१,३६९/- + शासन निर्णयाप्रमाणे मंजूर ७% ईटीपी चार्जेस रु.३,४०,२९६/- = ५२,०१,६६५/-) रुपये ५२,०१,६६५/- इतकी येत आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.४६,८१,४९८/- इतके अनुदान अनुज्ञेय आहे. खापा नगर परिषदेस यापुर्वी रु.२९,९७,०००/- अनुदान वितरीत करण्यात आले असल्याने उर्वरित अनुदान रु.१६,८४,४९८/- खापा नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. १४.९.२०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या खापा शहर पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु.१६,८४,४९८/- (रुपये सोळा लाख चौऱ्याऐंशी हजार चारशे अठ्ठयाण्णव फक्त) पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| खापा जि. नागपूर | ५२,०१,६६५ | ४६,८१,४९८ | ५,२०,१६७ | ५,२०,१६७ | २९,९७,००० | १६,८४,४९८ |
| | | | | | एकुण रुपये | १६,८४,४९८ |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०११३२१०४४८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873e6409c70b0a0219d717dd6767c9aec9dd2d61ecf0cc982e9e93ef57312675, cn=Sunil Jairam Tumram
Date: 2017.08.02 11:09:07 +05'30'

**( सु.ज. तुमराम )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
- प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल-२, नागपूर

- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
- जिल्हाधिकारी, नागपूर
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- मुख्याधिकारी, खापा नगरपरिषद, ता. सावनेर, जि. नागपूर
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जल व उर्जा लेखापरिक्षण विभाग, नागपूर
- जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.